**३४५४, जनगणना, सर्वेक्षण व सांख्यिकी या लेखाशीर्षाखाली (०३) (२३) गृह व इमारत बांधकाम विषयक सांख्यिकी गोळा करणे (१००%केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत योजना) याकरीता उपशीर्ष सुरु करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नियोजन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः असासं २५१४/प्र.क्र.१५७/का.१४१७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-३२

तारीख: ०३ मार्च, २०१५.

<u>प्रस्तावना -</u>

राष्ट्रीय भवन निर्माण संघटना ही गृहनिर्माण व नागरी गरीबी निर्मुलन मंत्रालय, केंद्र शासन, नवी दिल्ली यांच्या अधिपत्याखाली कार्यरत आहे. केंद्र शासनाचा बांधकाम विषयक सांख्यिकी माहितीचा उपयोग लक्षात घेऊन राज्यनिहाय बांधकामाची मंजूरी व बांधकाम पूर्ण झाल्यानंतर बांधकाम पूर्णतेची माहिती, बांधकाम साहित्याच्या किंमती व मजूरीचे दर इ. बांधकाम सांख्यिकी त्रैमासिक तत्वावर गोळा करणे व केलेल्या माहितीचे संस्करण करुन अंतिम माहिती प्रकाशित करणे हे या संस्थेचे प्रमुख उद्दिष्ट आहे. राष्ट्रीय भवन निर्माण संघटना यांच्या दिनांक २८.०४.२०१४ च्या पत्रान्वये राष्ट्रीय भवन निर्माण संघटना (NBO) यांनी सन २०१४-१५ च्या पहिल्या तिमाहीपासून महाराष्ट्रातील २२ जिल्ह्यांतील ३२ शहरांमधील चालू गृहनिर्माण व बांधकाम उपक्रमांची सद्य:स्थिती, देण्यात आलेल्या बांधकाम परवानग्या व पूर्णत्व प्रमाणपत्रे, बांधकाम साहित्याच्या किंमती, बांधकाम मजूरीचे दर इ. बाबतची माहिती मासिक / त्रैमासिक तत्त्वावर गोळा करुन राष्ट्रीय भवन निर्माण संघटनेस पाठविण्याचे काम अर्थ व सांख्यिकी संचालनालयाकडे सोपविले आहे. तसेच राष्ट्रीय भवन निर्माण संघटनेने Housing Start-up Index(HSUI)-२ परिगणित करण्यासाठी आवश्यक असलेली निवडक शहरांची Building permits ची माहिती ५ शहरांत सन २०११-१२,२०१२-१३ व २०१३-१४ साठी गोळा करण्याचे काम देखील अर्थ व सांख्यिकी संचालनालयाकडे सोपविले आहे.

गृह व इमारत बांधकाम विषयक सांख्यिकी गोळा करणे (१००% केंद्र पुरस्कृत योजना) या नवीन योजनेकरीता येणारा अपेक्षित खर्च भागविण्यासाठी अर्थसंकल्पात तरतूद करण्याकरिता नवीन उपशीर्ष उघडण्याची आवश्यकता होती.

**शासन निर्णय-**

उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेऊन ३४५४-जनगणना, सर्वेक्षण व सांख्यिकी या मुख्य लेखाशीर्षाखाली खालीलप्रमाणे नवीन उपशीर्ष सुरु करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

मागणी क्रमांक ओ-९,
३४५४ -जनगणना सर्वेक्षण व सांख्यिकी
०२ - सर्वेक्षण व सांख्यिकी
११२ - आर्थिक सल्ला व सांख्यिकी
०३ -नियोजनासाठी आकडेवारी
२३ - गृह व इमारत बांधकाम विषयक सांख्यिकी गोळा करणे (१००% केंद्र पुरस्कृत योजना) (३४५४०५८१) (योजनांतर्गत) (दत्तमत)
३१ - सहायक अनुदाने (वेतनेतर)

Grant No.O-०९
३४५४ - Census, Surveys and Statistics
०२ - Surveys and Statistics
११२ -Economic Advice and Statistics
०३ - Statistics for Planning
२३ - Collection of Housing and Building Construction Statistics (१००% Centrally Sponsored) (३४५४०५८१) (Plan) (Voted)
३१ - Grant-in-Aid (Non-Salary)

सदर शासन निर्णय, वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्र.२५/अर्थ-१६,दिनांक ०५.०२.२०१५ अन्वये तसेच महालेखापाल (लेखा व हकदारी ) -१ महाराष्ट्र, मुंबई यांचा अनौपचारीक संदर्भ क्र.सं.ख.वि./चा-१/नियोजन विभाग/यूओआर-१७७/२०१५-१५/१०६४, दिनांक २०.०१.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०३११३११११५५१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Shankar Kulkarni

Digitally signed by Vasant Shankar Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Shankar Kulkarni
Date: 2015.03.03 11:41:52 +05'30'

( वसंत कुळकर्णी )
उप सचिव

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा व हकदारी) महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
३. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. कार्यासन व्यय-८, अर्थसंकल्प-१६, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. कार्यासन अधिकारी कार्यासन कार्यासन १४११/कार्यासन १४१२/१४२४ (अर्थसंकल्प), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८.निवडनस्ती, १४१७.